**वन्य प्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या राज्य योजनेंतर्गत विविध कार्यबाबींचा समावेश करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी- ०६.२४/प्र.क्र.११३/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ११ जुन, २०२४.

**<u>प्रस्तावना :-</u>**

महाराष्ट्र राज्यात एकूण ६१९०७.०५ चौ.कि.मी. वनक्षेत्र असून त्याचे भौगोलिक क्षेत्राशी प्रमाण २०.१२ टक्के एवढे आहे. त्याचबरोबर वन्यजीवांचे व त्यांच्या अधिवासाचे संरक्षण करण्याच्या दृष्टीने वन्यजीव (संरक्षण) अधिनियम, १९७२ च्या तरतूदीनुसार राज्यामध्ये ५२ वन्यजीव अभयारण्ये, ६ राष्ट्रीय उद्याने व २८ संवर्धन राखीव क्षेत्रे अधिसूचीत करण्यात आली आहेत. तसेच व्याघ्र सवंर्धनाचा महत्वपूर्ण उद्देश विचारात घेता २० संरक्षित क्षेत्रांचा समावेश करुन राज्यात एकूण ६ व्याघ्र प्रकल्पांची निर्मिती करण्यात आली आहे.

राज्यातील वनक्षेत्रात तसेच क्षेत्रालगत असलेल्या भागामध्ये वन्यजीवांचा वावर मोठ्या प्रमाणात दिसून येतो. वन्यप्राणी बचाव कार्यामध्ये जखमी झालेल्या वन्यप्राण्यांवर उपचार करणे व त्यांना त्यांचे नैसर्गिक अधिवासात निसर्गमुक्त करणे, कायमस्वरुपी अपंगत्व आलेल्या प्राण्यांची देखभाल करणे, मानवी जिवितास धोकादायक ठरलेल्या प्राण्यांना वेळ प्रसंगी कायमचे जेरबंद करण्याकरीता वन्यप्राणी बचाव केंद्राची / ट्रांझिट ट्रीटमेंट सेंटरची निर्मिती करणे गरजेचे आहे. तसेच क्षेत्रिय स्तरावर बचाव कार्यादरम्यान करीता उपयुक्त आधुनिक उपकरण व साहित्याने सुसज्ज असलेले बचाव वाहन आवश्यक आहे. राज्यामध्ये नामशेष होणाऱ्या वन्यजीव प्रजातींचे संवर्धनासाठी सुविधा निर्माण करणे देखील वन्यजीव संरक्षणाचा महत्वपूर्ण घटक आहे. या दृष्टीने उपरोक्त बाबींच्या अनुषंगाने वन्य प्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या राज्य योजनेच्या कार्यबाबी स्पष्टपणे विनिर्दिष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

राज्य योजना “वन्य प्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२)” या योजनेंतर्गत खालील कार्यबाबींचा समावेश करण्यात येत आहे :-

**<u>योजनेचे मुख्य उद्दिष्ट</u> :-**

i. वन्यप्राणी बचाव केल्यानंतर जखमी वन्यप्राण्यांवर ट्रांझिट ट्रीटमेंट सेंटरमध्ये उपचार करुन निसर्गमुक्त करणे.
ii. नैसर्गिक अधिवासात मुक्त करण्यायोग्य नसलेल्या वन्यप्राण्यांची बचाव केंद्रामध्ये देखभाल करणे.
iii. मानवी जिवितास धोकादायक ठरलेल्या वन्यप्राण्यांना बचाव केंद्रामध्ये कायमचे जेरबंद करणे.
iv. नामशेष होणाऱ्या प्रजातींच्या संवर्धनासाठी प्रजनन केंद्र स्थापन करणे.

**<u>योजनेंतर्गत समाविष्ट कार्यबाबी</u> :-**

१. ट्रांझिट ट्रीटमेंट सेंटर निर्मीती करणे व त्यासाठी आवश्यक मनुष्यबळ, साहित्य व यंत्रसामग्री उपलब्ध करणे.
२. वन्यप्राणी बचाव केंद्र निर्मिती करणे व त्यासाठी आवश्यक मनुष्यबळ, साहित्य व यंत्रसामग्री उपलब्ध करणे.
३. नामशेष होणाऱ्या प्रजातींच्या संवर्धनासाठी प्रजनन केंद्र निर्मिती करणे व त्यासाठी आवश्यक मनुष्यबळ, साहित्य व यंत्रसामग्री उपलब्ध करणे.

४. वन्यप्राणी बचाव कार्याकरिता वन्यप्राणी बचाव केंद्र / ट्रांझिट ट्रीटमेंट सेंटरशी संलग्नीत विशेषीकृत बचाव वाहन खरेदी करणे व सदर वाहनाची देखभाल दुरुस्ती.

**योजनेची अंमलबजावणी**

१. वन्यप्राणी बचाव केंद्र / प्रजनन केंद्र निर्मिती करण्यासाठी केंद्रीय प्राणीसंग्रहालयाची मान्यता घेणे बंधनकारक राहील.

२. ट्रांझिट ट्रीटमेंट सेंटर / वन्यप्राणी बचाव केंद्र / प्रजनन केंद्रासाठी आवश्यक साहित्य व यंत्रसामग्रीचे मानक विनिर्देश (standard specification) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली असलेल्या समितीने निश्चित करून द्यावे. समितीमध्ये प्रादेशिक आणि वन्यजीव वृत्ताचे मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक (प्रत्येकी-१), किमान २ उपवनसंरक्षक (प्रादेशिक), १ पशुवैद्यकीय अधिकारी यांचा यांचा समावेश असेल व वनसंरक्षक / उपवनसंरक्षक (वन्यजीव-नियोजन व व्यवस्थापन) हे समितीचे सदस्य सचिव असतील. समितीने निश्चित केलेली मानके आर्थिक वर्षामध्ये एकदा सुधारीत करता येतील.

३. ट्रांझिट ट्रीटमेंट सेंटर / वन्यप्राणी बचाव केंद्र / प्रजनन केंद्रासाठी आवश्यक साहित्य व यंत्रसामग्रीची उपलब्धता विचारात घेऊन वनवृत्ताकडून संबंधित अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांचे मार्फत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) व शासनाकडे सादर करावा. खरेदी करण्यात आलेल्या साहित्य / उपकरणांची जडवस्तु संग्रह नोंद वहीमध्ये नोंद घेणे बंधनकारक राहील.

४. संबंधित उपवनसंरक्षक / उप संचालक / विभागीय वन अधिकारी यांनी उपलब्ध साहित्याच्या सुचीबाबत (Inventory) प्रमाणपत्र प्रस्तावासह सादर करावे.

५. खरेदी प्रकियेच्या अनुषंगाने वेळोवेळी शासन स्तरावरुन निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सुचनांचे पालन करण्यात यावे.

६. संरक्षण मजुर लावताना शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एलएवी १०९४/प्र.क्र. २५२/फ-६, दिनांक ३१.०१.१९९६ च्या तरतुदीप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१३१६४५०९३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.06.13 16:58:39 +05'30'

**( सिद्धेश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी,**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई / पूर्व, नागपूर.
५) सर्व मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक / उप वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, व्याघ्र प्रकल्प

६) सर्व मुख्य वनसंरक्षक / वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव)

७) सर्व उप वनसंरक्षक / उप संचालक / विभागीय वन अधिकारी (प्रादेशिक / वन्यजीव)

८) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

९) कार्यासन अर्थ-६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

१०) कार्यासन - १४७५, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई - ३२.

११) कार्यासन- ब- १, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१२) कार्यासन- फ-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).